**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा कार्यक्रमाअंतर्गत (ISSNIP-World Bank) अंतर्गत प्रशिक्षण साहित्य छपाई करुन घेण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१६/प्र.क्र.१७८/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १७ मे, २०१७

**पहा :** - १) केंद्र शासनाची प्रशासकीय मान्यता पत्र क्र.F.No.१०.१/२०१३-WBP, दि.१८/०३/२०१६
२) महिला व बाल विकास विभागाची प्रशासकीय मान्यता पत्र क्र.एबावि-२०१६/प्र.क्र.१७८/का.६, दि.२१/११/२०१६
३) आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांचे पत्र क्रमांक एबाविसेयो/ISSNIP/०१६/२०१७,दिनांक ०१/०२/२०१७

**प्रस्तावना :-** केंद्र शासनाने जागतिक बँकेच्या सहाय्याने अंमलात आणलेली एकात्मिक बालविकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प या योजनेची राज्यातील २० जिल्हयात ३१७ प्रकल्पात एकूण ६०१३२ अंगणवाडी केंद्रात अंमलबजावणी सुरु करण्यास दिनांक ३० एप्रिल, २०१४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. केंद्र शासनाने जागतिक बँक प्रकल्प, एकात्मिक बाल विकास सेवा योजना बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्पाची पुनर्रचना मार्च-२०१६ मध्ये केलेली आहे. त्यानुसार पुर्वी केंद्र हिस्सा ९०% व राज्य हिस्सा १०% असे निधीचे प्रमाण होते. त्यामध्ये बदल करुन केंद्र हिस्सा ८८% व राज्य हिस्सा १२% असे निधीचे प्रमाण करण्यात आलेले आहे.

२. केंद्र शासनाने दिनांक १८ मार्च, २०१६ च्या पत्रान्वये ISSNIP (World Bank) कार्यक्रमाअंतर्गत DLI-१, DLI-२, व DLI-३ व DLI-४ उपक्रम राज्यात राबविण्यास मंजूरी दिलेली आहे. सदर उपक्रम राबविण्यासाठी रुपये ९७.४३ कोटी खर्च येणार असून केंद्र शासनाकडून ८८% म्हणजे रुपये ८५.७४ कोटी व राज्य हिस्सा १२% म्हणे रुपये ११.६९ कोटी इतका निधी उपलब्ध होणार आहे.

३. DLI-२ अंतर्गत या मोबाईलमध्ये Common Application Software (CAS) Install केले जाणार आहे. या सॉफ्टवेअरची माहिती सेविकांना होण्यासाठी माहिती पुस्तिका (User Manual) आणि प्रशिक्षण पुस्तिका (Training Manual) तसेच ILA व CBE अंतर्गत मार्गदर्शक सूचना ILA मॉडयुल्स व इतर आवश्यक साहित्य छपाई करण्याच्या कामास प्रशासकीय मान्यता देऊन ई-निविदा प्रकाशित करण्यास शासनाची मंजूरी मिळण्याबाबत आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी परवानगी मागितली होती. त्यानुसार दिनांक २१ नोव्हेंबर, २०१६ च्या पत्रान्वये शासनाची मान्यता देण्यात आलेली होती.

४. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी दिनांक १ फेब्रुवारी, २०१७ च्या पत्रान्वये प्रशिक्षण साहित्य छपाईसाठी ABI Print हे L1 निविदाधारक ठरलेले असल्याचे कळविले आहे. छपाई करावयाच्या वेगवेगळया पुस्तकांनुसार रुपये ४७,५६,५००/- इतक्या रक्कमेस मान्यता देण्याबाबत व निधी उपलब्ध करुन देण्याबाबत कळविले आहे. त्यानुसार मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** एकात्मिक बालविकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प ISSNIP (World Bank ) अंतर्गत माहिती पुस्तीका (User Manual) आणि प्रशिक्षण पुस्तिका (Training Manual) ILA व CBE अंतर्गत मार्गदर्शक सूचना ILA मॉडयुल्स व इतर आवश्यक साहित्य छपाई करण्यासाठी मे. ABI Print, नवी मुंबई या पुरवठादारांकडून छपाई करुन घेण्यासाठी येणाऱ्या रुपये ४७,५६,५००/- (रुपये सत्तेचाळीस लाख छप्पन्न हजार पाचशे फक्त) इतक्या खर्चास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

**यासंदर्भातील अटी व शर्ती खालीलप्रमाणे राहतील.**

१) सदर खरेदी करतांना ई-निविदेतील अटी व शर्तीचे पालन तंतोतंत करावे. तसेच ई-निविदेत स्पष्ट केल्याप्रमाणे (Specification प्रमाणे) पुरवठा केला जाईल याची दक्षता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना महाराष्ट्र राज्य व राज्य प्रकल्प संचालक, जागतिक बँक सहाय्यित एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी घ्यावी.

२) सदरचा निधी शासनाच्या विहित धोरणानुसार व कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येईल .

३) पुरवठादाराने वरीलप्रमाणे वरील वस्तुंचा पुरवठा प्रकल्पस्तरापर्यंत करावा. पुरवठाधारकाकडून साहित्य विहित कालावधीत संबंधितांना प्राप्त होण्यासाठी पुरवठा करण्याचा अंतिम दिनांक पुरवठाधारकास बंधनकारक करण्यात यावा.

४) वरील वस्तूंचा पुरवठा उपलब्ध तरतूदीतून विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावा. पुरवठादाराने मागणीप्रमाणे विहित प्रमाणात, विहित केलेल्या गुणवत्तेनुसार वरील वस्तुंचा प्रकल्पस्तरापर्यंत पुरवठा केला आहे, याबाबतची खात्री करण्यात यावी. तसेच सदर पुरवठा केलेल्या बाबीवर आयसीडीएस अंतर्गत ISSNIP च्या वापरासाठी / शासनामार्फत पुरवठा असा शिक्का किंवा लेबल लावलेला असावा. वरील वस्तूंचे वाटप / पुरवठा व खर्च यामध्ये अनियमितता झाल्यास व लेखा आक्षेप उद्भवल्यास त्याची जबाबदारी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना महाराष्ट्र राज्य व राज्य प्रकल्प संचालक, जागतिक बँक सहाय्यित एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांची राहील.

५) हया योजनेचा लाभ लाभार्थ्यांना पोहचावा, यादृष्टीने स्वयंस्पष्ट माहिती प्रकल्प कार्यालयातील नोंदवहीमध्ये उत्पादनाचा दिनांक / एकूण पुरवठा / एकूण उपयोग याबाबतची योग्य नोंद ठेवणे, इत्यादीबाबत उचित मार्गदर्शक सूचना आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी द्याव्यात.

६) सदर आदेशानुसार प्रत्यक्षात पुरवठा झालेला आहे, याची खात्री झाल्यावरच देयक अदा करण्यात यावे. यासाठी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना महाराष्ट्र राज्य व राज्य प्रकल्प संचालक, जागतिक बँक सहाय्यित एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई हे जबाबदार राहतील.

२. या प्रयोजनासाठी होणारा केंद्र हिश्याचा खर्च मागणी क्र.एक्स-१, २२३६- पोषण आहार, (०६) (०६) जागतिक बँकेचे सहाय्य, एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण आहार सुधारणा प्रकल्प (केंद्र हिस्सा ८८% ) (२२३६१८८३) ५०- इतर खर्च व राज्य हिश्याचा खर्च मागणी क्र.एक्स-१, २२३६-पोषण आहार, (०६) (०७) एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण आहार सुधारणा प्रकल्प (राज्य हिस्सा १२% ) (२२३६१८९२) ५०- इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ या चालू आर्थिक वर्षी मंजूर व उपलब्ध असलेल्या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.६९/१७/व्यय-६,दिनांक १७/०३/२०१७ अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१७१५४६३२७६३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2017.05.17 17:18:58 +05'30'

**(ला. रा. गुजर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (महिला व बाल विकास) मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
३) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) राज्य प्रकल्प संचालक, जागतिक बँक प्रकल्प, एकात्मिक बाल विकास सेवा योजना बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
५) सर्व जिल्हाधिकारी
६) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
७) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग.
८) सर्व महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद
९) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण)
१०) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई
११) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई
१२) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -२, नागपूर
१३) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१७) कक्ष अधिकारी (का.४) महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
१८) वित्त विभाग,(विनियम/व्यय-६) मंत्रालय, मुंबई
१९) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२०) निवड नस्ती (कार्यासन ६)